**नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई यांच्या कार्यालयातील वाहन चालक (वर्ग-४) ची पदे मे.क्रिष्णा मोटर्स, मुंबई या बाहययंत्रणेकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या सेवेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- वाहन-२०२४/प्र.क्र.१३८/ना.पु.-१५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२४.

**संदर्भ :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५.
२) अ.ना.पु. व ग्रा.सं. वि, शासन निर्णय क्र. संकीर्ण १०१७/प्र.क्र.१५६/ना.पु.१२, दि.१८.०४.२०२२.
३) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. काआआ-२०१३/प्र.क्र. २३३/कामगार-८, दि.१४.०३.२०२३.
४) अ.ना.पु. व ग्रा.सं. वि, पत्र क्र. वाहन-२०२३/प्र.क्र. १९७/ना.पु.-१५, दि.०९.०८.२०२३.
५) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/आस्था/४/का.वि. ४११ / २०२३/ जा. ६४०, दि. २६.०९.२०२३.
६) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/आस्था/४-अ /२०२३ /जा.६५४, दि. ०६.१०.२०२३.
७) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांचे आक्षेप क्र. १३६८८१, दि. १८.१२.२०२३.
८) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/आस्था/क-अ/२०२३ / जा. ८१८, दि.२८.१२.२०२३.
९) सहायक लेखाधिकारी, नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/लेखा/०३/आ. ख./२०२३-२४/ जा.०१, दि. ०२.०१.२०२४.
१०) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/आस्था/४-अ / २०२३ /जा.११, दि. ०५.०१.२०२४.
११) अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., शासन निर्णय क्र. वाहन २०२३/प्र.क्र.१९७/ना.पु.-१५, दि. ०२.०२.२०२४.
१२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/आस्था/४-अ /२०२३ /जा.१०३, दि. १३.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त कार्यालयातील पदांचा सुधारीत आकृतीबंध दि.१८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधान्वये नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई, विभागीय जिल्हा पुरवठा कार्यालय व राज्य अन्न आयोगाच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील वाहनचालक व शिपाई ही संवर्ग मृत घोषित करुन, त्याबाबतच्या सेवा बाह्ययंत्रणेव्दारे घेण्याबाबत मान्यता दिलेली आहे.

२. या विभागाचे कामकाज अत्यंत संवेदनशील असल्यामुळे बाह्यस्त्रोताव्दारे वाहनचालक व शिपाई संवर्गात मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यासंदर्भात क्षेत्रिय कार्यालयाकडून विनंती करण्यात येत आहे. सदर बाब विचारात घेऊन तात्पुरती व्यवस्था म्हणून वाहनचालक व शिपाई संवर्गातील पदावर बाह्यस्त्रोताव्दारे मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यास दि. ०९.०८.२०२३ रोजीच्या शासन पत्रान्वये मान्यता दिली आहे.

सदरची रिक्त पदे उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र. ६ अन्वये तसेच वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १, २ व ४ अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार बाह्ययंत्रणेमार्फत मनुष्यबळ पुरविण्यात येणाऱ्या सेवा पुरवठादार संस्थेकडून भरण्याबाबत संदर्भ क्र. ७ च्या पत्रान्वये नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांना कळविण्यात आले होते. त्यानुसार उपरोक्त कार्यालयातील रिक्त असलेली वाहनचालकांची ४ पदे बाह्ययंत्रणेमार्फत भरण्यासाठी नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी संदर्भ क्र.९ व १० च्या आदेशानुसार मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई या निविदाकाराच्या पॅनलची निवड करुन दि. ०६.१०.२०२३ ते दि.३१.१२.२०२३ (तीन महिने) व दि. ०१.०१.२०२४ ते दि. ३१.०३.२०२४ (तीन महिने) या कालावधीपर्यंत सदर सेवा पुरवठादार संस्थेशी करारनामा केला आहे. त्यानुसार दि. ०६.१०.२०२३ ते दि.३१.१२.२०२३ (तीन महिने) या कालावधीकरीता सेवापुरवठादार संस्थेने उपलब्ध करुन दिलेल्या ०२ वाहनचालकांचे वेतन अदा करण्यासाठी संदर्भ क्र. १३ येथील दि. ०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

उर्वरित ०२ वाहनचालकांचे दि.०६.१०.२०२३ ते दि. ३१.१२.२०२३ या कालावधीतील तसेच पुढील तीन महिन्याच्या (दि.०१.०१.२०२४ ते दि. ३१.०३.२०२४ ) कालावधीतील ०४ वाहनचालकांचे मनुष्यबळ उपलब्ध करुन दिलेल्या मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई या सेवा पुरवठादार संस्थेला वेतन / अतिकालीक भत्ता अदा करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**-: शासन निर्णय :-**

नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या कार्यालयांकरिता वाहनचालकांच्या रिक्त असलेल्या पदांसाठी ०४ वाहनचालकांचे मनुष्यबळ मासिक दरावर मे.क्रिष्णा मोटर्स, मुंबई या सेवापुरवठादार संस्थेकडून नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या कार्यालयांकरिता उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. दि. ०६.१०.२०२३ ते दि.३१.१२.२०२३ (तीन महिने) या कालावधीकरीता सेवापुरवठादार संस्थेने उपलब्ध करुन दिलेल्या ०२ वाहनचालकांचे वेतन अदा करण्यासाठी संदर्भ क्र. १३ येथील दि. ०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उर्वरित ०२ वाहनचालकांचे दि.०६.१०.२०२३ ते दि.३१.१२.२०२३ या कालावधीतील तसेच पुढील तीन महिन्याच्या (दि.०१.०१.२०२४ ते दि. ३१.०३.२०२४ ) कालावधीतील ०४ वाहनचालकांचे मनुष्यबळ मे.क्रिष्णा मोटर्स, मुंबई या सेवापुरवठादार संस्थेकडून नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या कार्यालयांकरिता उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

३. सदर सेवापुरवठादार संस्थेने उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळांच्या वेतनापोटी प्रति उमेदवार, प्रति माह रु.१९,५००/- (GST सहीत) तसेच अतिकालीक भत्ता (प्रती तास) मुंबईमध्ये रु.४०/- प्रतितास + रात्री १० नंतर कामासाठी थांबावे लागल्यास जेवण भत्ता रु.१००/- तसेच मुंबई बाहेरील भत्ता रु.२५०/- (रु.४० प्रतितास नियमानुसार) इतक्या येणाऱ्या खर्चास शासन परिपत्रक वित्त विभाग दि. ०२.०२.२०१३, दि.०२.१२.२०१३ व दि.०२.०८.२०१६ अन्वये देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार नियमित पध्दतीने पदे भरण्यावर खर्चाच्या तुलनेत बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेतांना खर्चात १०% ते २५% बचत होईल या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/४/२०१५ मधील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, उपविभाग-चार खर्चाच्या संकीर्ण बाबीमधील अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वरील होणारा खर्च सदर कर्मचा-यांच्या वेतनाचा खर्च मागणी क्र. एम-२ मुख्य लेखाशीर्ष " २४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०२) शिधावाटप (०२)(०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र दत्तमत (२४०८ ००६४) १०- कंत्राटी सेवा" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून वित्तीय वर्ष २०२३-२०२४ करिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच त्यापुढील खर्च सदर लेखाशीर्षातील त्या-त्या वर्षी मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३२११७३९२०२१०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJANAN RAMDAS DESHMUKH

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=09c74e56a555b1257e71176f4c700164528f1b5b3ff73c027668f5ff29c069da, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DEE8A196FB0BB879933A88F87075CC443D363994879D49E0C1BA541465369700, cn=GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2024.03.21 17:48:36 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
२) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
३) सर्व उपनियंत्रक शिधावाटप.
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) निवडनस्ती, ना.पु.१५